महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी, मुंबई या कार्यालयातील अस्थायी पदे दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- अशासे-२०२३/प्र.क्र.३७/नवि-१४**
मुख्य इमारत (४ था मजला), हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०१ मार्च, २०२३.

वाचा: १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एफएफएस-१०८६/सीआर-३५४/२५२५/२००३/ नवि-३०, दि.३०.०३.१९९०.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दि.१०.०२.२०१७.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.०८/आपुक, दि.०३.१०.२०१७.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.०८/आपुक, दि.३१.०८.२०२०.
५) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. एमसीओ-२०२०/प्र.क्र.१४०नवि-१४, दि.२६.०३.२०२१.
६) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. अशासे-२०२२/प्र.क्र.४६/नवि-१४, दि.१९.०९.२०२२.
६) संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय यांचे मअसे-२०२३/१-ए/२२७, दि.१०.०२.२०२३.
७) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०८.०२.२०२३.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, राज्य अग्निशमन नियंत्रण कक्ष, महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी व जिल्हा मुख्यालय यांच्या आस्थापनेवर शासनाच्या उच्चस्तरीय समितीने दिलेल्या मंजूरीनुसार १३१ पदांना संदर्भ क्र.५ येथील दि.२६.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. त्यापैकी १४ अस्थायी पदे दि.०१.०९.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भिय क्र.६ येथील दि.१९.०९.२०२२ च्या शासन निर्णयाव्दारे मान्यता दिली आहे. संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय यांनी संदर्भिय क्र.७ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील खालीलप्रमाणे नमूद १४ अस्थायी पदांना वित्त विभागाच्या दि.०८.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याच्या अटीच्या अधीन राहून दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ या कालावधीसाठी मुदतवाढ या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदाचे नाव | संख्या |
|---|---|---|
| १ | वरिष्ठ प्रशिक्षक | १ |
| २ | अधिक्षक | १ |
| ३ | लेखापाल | १ |
| ४ | लघुलेखक (मराठी-निम्नश्रेणी) | १ |
| ५ | कनिष्ठ प्रशिक्षक | १ |
| ६ | अग्निशमन प्रणेता | १ |
| ७ | चालक- यंत्र चालक | १ |
| ८ | अग्निशामक | ४ |
| ९ | शिपाई | १ |
| १० | सफाई कामगार | १ |
| ११ | रखवालदार | १ |
| | **एकुण** | **१४** |

२. वरील पदांवर होणारा खर्च मागणी क्र. “एफ-२, मुख्य लेखाशिर्ष, २०७० इतर प्रशासनिक सेवा, १०८ आगीपासून संरक्षण व नियंत्रण, (००) (०३) संचालन व प्रशासन, शासनाच्या अग्निशमन सल्लागारांच्या प्रशिक्षणार्थ्यांच्या आस्थापनेवरील खर्च, दत्तमत्त-(२०७० ०५७७)” या लेखा शिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात येऊन, सन २०२३-२०१४ च्या मंजूर वित्तीय तरतूदींमधून भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०८.०२.२०२३ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३०११२२८४४६५२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by C Priyanka
Date: 2023.03.01 12:32:20 +05'30'

**(प्रियांका कुलकर्णी-छापवाले)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) स्वीय सहायक, प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४) स्वीय सहायक, प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, सांताक्रुझ(पू), मुंबई-४०० ०९८.
६) महालेखाकार, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
७) अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०० ०५१
८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९) वित्त विभाग (व्यय-३/सुधारणा/ अर्थसंकल्प-१६) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) कार्यासन अधिकारी, (नवि-३/नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१२) निवडनस्ती (नवि-१४).